मुंबई शहर तसेच पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे.पीडब्ल्युसी या कंपनीला मुदतवाढ देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: १३ डिसेंबर २०१८

**वाचा :**

१) माहिती व तंत्रज्ञान विभाग आणि मे. पीड्ब्ल्युसी कंपनी यांच्यामध्ये झालेला करार दि.१७.११.२००९

२) माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/o Directorate of IT-DIT (MH), दि.१.७.२०१४.

३) गृह विभाग शासन निर्णय, क्र.गृहआ २०१५/प्र. क्र.२३०/आस्था-२, दि.२०.०५.२०१५.

४) शासन निर्णय क्र. सीसीटी ३६१५/प्र.क्र. ९३/पोल-३, दि.२९.०५.२०१५.

५) गृह विभाग, शासन निर्णय सीसीटी ३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३,दि.२५.७.२०१६.

६) मे.प्राईस वॉटर हाऊस कुपर्स लि. यांचे दि.२०.४.२०१७ चे पत्र.

७) पोलीस आयुक्त,पुणे यांचे दि.१२.६.२०१७ चे पत्र.

८) गृह विभाग, प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या (PIC) दि.२७.६.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

९) माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. GAD मातंसं ०८०/४/२०१४-O/O, दि.२०.०३.२०१८

१०) पोलीस आयुक्त, पुणे यांचे दि.२६.०४.२०१८ चे पत्र

११) गृह विभाग, प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या (PIC) दि.१०.०८.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

गृह विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात सल्लागाराच्या कामकाजासाठी मे.पीडब्ल्युसी या कंपनीची माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत दि.१७.११.२००९ रोजीच्या करारान्वये नेमणुक करण्यात आली होती. सदर कंपनीला गृह विभाग शासन निर्णय दि.२९.०५.२०१५ अन्वये दि. ३०.०४.२०१६ रोजीपर्यंत गृह विभाग शासन निर्णय दि.२५.७.२०१६ अन्वये दि.३०.४.२०१७ पर्यंत तसेच शासन निर्णय दि.२५.०७.२०१७ अन्वये दि.३०.४.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. त्याचबरोबर पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून सदर कंपनीची गृह विभाग शासन निर्णय दि.२९.५.२०१५ अन्वये दि.३०.०४.२०१६ रोजीपर्यंत नेमणूक करण्यात आली होती,गृह विभाग शासन निर्णय

दि. ५.६.२०१७ अन्वये दि ३०.६.२०१७ पर्यंत तसेच गृह विभाग शासन निर्णय दि. २५.०७.२०१७ अन्वये दि.३०.६.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. मुंबई शहर व पुणे शहर सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वयन कालावधीदरम्यान शासन व पोलीस प्रशासनास तांत्रिक सहाय्य करण्यासाठी सल्लागारांची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने दि.२०.०५.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये गृह विभागातील ई-गर्व्हनन्स प्रकल्प राबविण्यासंदर्भात विविध निर्णय घेण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या (PIC) दि.१०.०८.२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये मे.पीडब्ल्युसी कंपनीला मुंबई व पुणे शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :

गृह विभाग शासन निर्णय दि.२०.५.२०१५ अन्वये अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१०.०८.२०१८ रोजी पार पडलेल्या बैठकीतील निर्णयानुसार मे.प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा. लि. या कंपनीस मुंबई शहर तसेच पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून खालीलप्रमाणे मुदतवाढ देण्यात येत आहे :-

अ) पुणे सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे.पीडब्ल्युसी कंपनीच्या एका वरिष्ठ सल्लागारास पूर्णवेळसाठी दि. १ जुलै २०१८ ते ३० जुन, २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

ब) पुणे सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे.पीडब्ल्युसी कंपनीच्या एका अतिरिक्त सल्लागाराची दि.१ जुलै २०१८ ते ३० जुन २०१९ या कालावधीसाठी नियुक्ती करण्यात येत आहे.

क) मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाच्या देखरेखीसाठी मे.पीडब्ल्युसी कंपनीच्या एका प्रमुख सल्लागारास २५ टक्के (१/४ ) तत्वावर, एका व्यवस्थापकीय सल्लागारास अर्धवेळ तत्वावर,एका व्यवस्थापकीय सल्लागारास व एका वरिष्ठ सल्लागारास पुर्णवेळ तत्वावर दि.१.५.२०१८ ते दि.३०.४.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भ क्रमांक ९ येथे नमुद दि.२०.०३.२०१८ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहील तथापि माहिती व तंत्रज्ञान विभागाने सल्लागारांच्या मानधनासंदर्भात भविष्यात काही सुधारणा केल्यास सदर सुधारणा उपरोक्त सल्लागारांना लागु राहतील. तसेच त्यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागाने सदर कंपनीची नेमणुक (Empanelment) करणे आवश्यक राहील.

३. सर्व सल्लागारांना देण्यात येणारे मानधन हे दरमहा-प्रती व्यक्ती (Man-Month) तत्वानुसार असेल. सर्व सल्लागारांचे दरमहा देयके शासनास सादर करतांना सल्लागारांनी महिन्याच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील/ अहवाल शासन सादर करणे आवश्यक आहे.

४. पुणे सीसीटीव्ही प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांच्या मानधनाबाबतचा खर्च पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५-पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांना मानधन देण्यासाठी येणारा खर्च पोलीस आयुक्त, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५-पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (दत्तमत) (२०५५ ००९७), ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१३१७१६१७४८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.12.13 17:24:18 +05'30'

**( दिनेश आ.सस्ते)**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. पोलीस आयुक्त, मुंबई,
९. पोलीस आयुक्त, पुणे
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३.निवडनस्ती, पोल-३